# सम्राट आणि पतंग

लेखिका: जेन योलेन; चित्रे: एड यंग

मराठी अनुवाद: सुशील मेन्सन

राजकुमारी *ज्यो स्यो,* म्हणजे *बुटकी,* ही सम्राटाची सर्वात धाकटी मुलगी होती. इतर भावंडांच्या तुलनेत तिच्याकडे कुटुंबीय फारसे लक्ष देत नसत. त्यामुळे ती तिचा बराचसा वेळ पतंगाशी खेळण्यात घालवत असे. हा पतंग कागद आणि काड्यांनी बनलेला होता.

एकदा बंडखोरांनी सम्राटाला अटक करून एका उंच मनोऱ्यात बंदिस्त करून ठेवले. तेव्हा बुटकीने मोठ्या संयमाने आणि हुशारीने आपल्या केसांपासून एक मजबूत लांब दोर बनवला. पतंगाच्या मदतीने तिने हा दोर आपल्या वडिलांपर्यंत पोहोचवला आणि आपल्या वडिलांना कैदेतून मुक्त केले.

एड यंग यांची रंगीत चित्रे कथेला समर्पक आहेत. ही चित्रे परंपरागत पेपरकट तंत्र वापरून बनवलेली आहेत. प्रसिद्ध लेखिका जेन योलेन यांनी अतिशय ओघवत्या शैलीत ही कथा लिहिली आहे. प्राचीन चीनमधील चित्र काढण्याच्या एका अनोख्या तंत्राची झलक या कथेत बघायला मिळते. निष्ठा आणि प्रेम ही मूल्ये या कथेचा गाभा आहे.

प्राचीन चीनमध्ये एक राजकुमारी राहात होती. ती तेथील सम्राटाची चौथी मुलगी होती. ती खूप छोटीशी होती, त्यामुळे तिचे नाव *ज्यो स्यो*, म्हणजे *बुटकी* असे पडले. बुटकी असल्यामुळे ना कुणी तिच्याकडे फारसे लक्ष देत, ना कुणी तिचा विचार करत.

तिचे सर्व भाऊ तिच्यापेक्षा वयाने मोठे होते आणि अंगापिंडाने बळकट होते. ते सर्व फक्त स्वत:पुरताच विचार करत. सम्राटाच्या दृष्टिने हे भाऊ म्हणजे उगवते सूर्यच होते. ते राज्य करण्यामध्ये सम्राटाला मदत करत तसेच लोकांना शांततेचे धडे देत.

बुटकीच्या तीन बहिणीदेखील तिच्यापेक्षा वयाने मोठ्या आणि सुदृढ होत्या. सम्राटाच्या दृष्टिने त्या तिघी मध्यरात्रीच्या चंद्रासारख्या होत्या. त्या तीन बहिणी वडिलांच्या भोजनाची व्यवस्था पाहात असत.

बुटकी मात्र सम्राटाच्या दृष्टिने केवळ छोटीशी चांदणी होती. ती सम्राटाच्या भोजनासाठी तांदळाचा एक कणही आणू शकत नसे. त्यामुळे कुणी तिच्याकडे लक्ष देत नसत. सम्राट तर हे विसरूनच गेले होते की आपल्याला चौथी मुलगीसुद्धा आहे.

त्यामुळे बुटकी एकटीच भोजन करत असे. ती स्वत:शीच गप्पा मारत असे.

ती एकटी स्वत:सोबतच खेळत असे. कुठल्याही लहान मुलासाठी असे एकटेपण दु:खदच असते.

तिला तिची पतंग खूप आवडत असे. ही पतंग कागद आणि बांबूच्या काड्यांनी बनलेली होती.

दररोज सकाळी सूर्योदय होताच, पूर्वेकडून वारा वाहू लागे, तेव्हा बुटकी आपला पतंग उडवत असे. तसेच दररोज संध्याकाळी सूर्यास्त होताच, वारा पश्चिमेकडे वाहात असे, तेव्हाही बुटकी आपला पतंग उडवत असे. तिची पतंग आकाशातले जणू एक फूल होते. हे फूल वाऱ्यावर झुलायचे, तेव्हा प्रार्थना म्हणत असल्यागत वाटायचे.

एक संन्यासी दररोज महालासमोरून जात असे. त्याने बुटकीच्या पतंगावर एक कविता केली.

*माझी पतंग उडते वर*

*आभाळाची घेते खबर*

*माझा जीव झुले वाऱ्यावर.*

एका संन्याशाच्या मनात अशी कवीकल्पना येणे स्वाभाविक होते. राजकुमारी बुटकी कवितेसाठी त्याचे आभार मानत असे. मग ती पुन्हा पतंग उडवण्यात गुंग होत असे.

पण सम्राटाच्या राज्यात सारे काही आलबेल नव्हते. वारा कधी कायम शांत असतो का! वेगवान वारा तलावातील शांत पाण्यात तरंग निर्माण करतो. तसेच काही दुष्ट लोक सम्राटाविरुद्ध बंड करायचे ठरवू लागले.

एकदा सम्राटाची चारही मुले राज्यातील दूरवरील भागांची व्यवस्था राखण्यासाठी गेले होते. सम्राटाच्या थोरल्या तीन मुली बागेत फेरफटका मारत होत्या. त्याचवेळी बंडखोरांनी सम्राटावर हल्ला केला. राजकुमारी बुटकीने ही संपूर्ण घटना प्रत्यक्ष डोळ्यांनी बघितली. खूप छोटी असल्यामुळे कोपऱ्यात बसलेली बुटकी बंडखोरांना दिसू शकली नाही.

बंडखोर लोक सम्राटाला एका मैदानाच्या मधोमध उभ्या असलेल्या उंच मनोऱ्यात घेऊन गेले. त्या मनोऱ्याला फक्त एकच खिडकी होती. खिडकी मधोमध एकच लोखंडी गज होता. सम्राटाला कैद करून ठेवल्यावर बंडखोरांनी मनोऱ्याचे दरवाजे वीट आणि चुना लावून पक्के सीलबंद केले.

मग बंडखोर घोड्यांवर स्वार होऊन महालात परतले आणि त्यांनी सम्राटाचा मृत्यू झाल्याची घोषणा केली.

सम्राटाच्या मुला-मुलींनी ही बातमी ऐकली. भयभीत होऊन सुरक्षिततेसाठी त्यांनी शेजारच्या राज्यात आश्रय घेतला. झालेल्या घटनेमुळे ते असहायपणे रडूभेकू लागले, उसासे टाकू लागले. याशिवाय अधिक काही करणे त्यांना शक्य झाले नाही.

फक्त राजकुमारी बुटकी सोडून! ती इतकी छोटी होती की बंडखोरांनी तिला पाहिलेच नाही. ती सावकाशपणे मैदानातील मनोऱ्यानजिक गेली. तिथे तिने आपल्यासाठी फांद्या आणि पालापाचोळ्यापासून एक झोपडी बांधली.

दररोज पहाटे आणि रात्री बुटकी मनोऱ्याजवळ जात असे. तिथे ती आपला पतंग उडवत असे. पतंगाच्या दोरीला ती खाद्यपदार्थांची पिशवी अडकवत असे. त्यात भात, खसखसचे केक, शिंगाडे आणि ग्रीन टी असे. पतंग पिशवीला हवेत उंच उंच नेत असे, अगदी मनोऱ्याच्या खिडकीत! अशा प्रकारे तिने आपल्या वडिलांना, सम्राटाला अन्न पोहोचवून त्यांचा जीव वाचवला.

असे बरेच दिवस गेले. सम्राट मनोऱ्यात कैदेत होते आणि बुटकी राजकुमारी आपल्या छोट्याशा झोपडीत. दुष्ट बंडखोरांनी राज्याचा कारभार अतिशय क्रूरपणे चालवला. त्यामुळे राज्यातील लोक खूप दुःखी झाले.

एकदा बुटकी आपल्या वडिलांसाठी खाद्यपदार्थांची पिशवी भरत होती. त्याचवेळी वृद्ध संन्यासी तिच्या झोपडीजवळून गेला. त्याच्याकडे पाहून बुटकीने स्मित केले. त्याने बुटकीकडे पाहिलेसुद्धा नाही. पण चालताचालता तो मोठ्या आवाजात एक कविता म्हणू लागला, पुन्हापुन्हा:

*माझी पतंग उडते वर*
*आभाळाची घेते खबर*
*माझा राजा झुले वाऱ्यावर.*

बुटकी राजकुमारीने संन्याशाचे आभार मानले. पण अचानक तिला काही जाणवले. या कवितेत काहीतरी वेगळे होते, मूळ कवितेपेक्षा! त्यातील एक शब्द वेगळा होता. तिने संन्याशाला हाक मारली, “थांबा!” पण तोवर संन्यासी दूर निघून गेला होता. शेवटी तो ठरला एक संन्यासी आणि जगरहाटीशी त्याला काही देणेघेणे नव्हते.

पण बुटकी राजकुमारीला उमगले. संन्यासी तिला कवितेतून काहीतरी सुचवत होता. तिला त्याचा अर्थ समजला.

या घटनेनंतर, बुटकी वडिलांना खाद्यपदार्थ पोहोचवण्यासोबतच आणखी एक काम करू लागली. आपल्या लहान लहान हातांनी ती चारा, वेली आणि आपले केस यांच्यापासून एक दोर बनवू लागली.

जेव्हा दोर तिच्या कंबरेएवढा जाड आणि मनोऱ्याएवढा उंच झाला तेव्हा तिचे काम पूर्ण झाले. मग हा दोर पतंगाला बांधून ती मनोऱ्याजवळ गेली. तिथे पोहोचल्यावर तिने वडिलांना हाक दिली. पण तिचा आवाज खूप कमी होता. वेगवान वाऱ्यामध्ये तिचे शब्द हरवून जात होते.

काही वेळाने सम्राट खिडकीबाहेर डोकावला. त्याची धाकटी मुलगी पतंग उडवत होती. रोजच्यासारखेच ती अन्नाची पिशवी खिडकीत सोडेल, असे सम्राटाला वाटले. पण पिशवीऐवजी चारा, वेली आणि काळ्या केसांनी बनलेला एक जाडजूड दोर खिडकीत आलेला त्यांना दिसला. बाहेर जोराचे वारे सुटले होते. या वाऱ्याने पतंगाचा भार सांभाळला होता.

खाली जमिनीवर बुटकी राजकुमारी उभी होती. तिने दोराचे दुसरे टोक पकडले होते.

सम्राटाने आपल्या धाकट्या मुलीची किंमत याआधी कधीच ओळखली नव्हती, पण आज त्याला ती कळली. त्याने ठरवले की राजकुमारीची योजना यशस्वी झाली तर आपण तिची प्रत्येक इच्छा पूर्ण करायची आणि तिच्यावर खूप माया करायची. मग सम्राट मनोऱ्याच्या खिडकीतून बाहेर झुकला आणि त्याने दोर खेचून मनोऱ्यात आणला. त्याने पतंग दोरापासून अलग करून वाऱ्यावर सोडून दिला आणि म्हणाला, “जा महान पतंगा, जा आभाळात, तुझ्या घरी.” पतंग आभाळात उडून गेला.

मग सम्राटाने दोर खिडकीच्या मजबूत गजाला बांधला. दोराचे दुसरे टोक बुटकी राजकुमारीने आपल्या हातात धरले होते.

सम्राट खिडकीच्या चौकटीवर चढला आणि गजाच्या खालून बाहेर पडला. त्याने देवाचे आभार मानले आणि दोर घट्ट पकडून तो खाली उतरू लागला. त्याचा झगा वाऱ्याने फुगला आणि चमचमत्या पतंगासारखा फडफडू लागला.

पाय जमिनीवर टेकताच सम्राट आपल्या धाकट्या मुलीसमोर गुडघे टेकवून बसला. त्याने ओठांनी जमिनीचे चुंबन घेतले. मग उठून त्याने आपल्या मुलीला कवेत घेतले. बुटकी राजकुमारी आपल्या वडिलांच्या कुशीत हरवली.

आपल्या मुलीच्या डोक्यावर हात ठेवून सम्राट म्हणाला, “चल आपल्या घरी, माझ्या निष्ठावंत मुली.” छोट्याशा राजकुमारीला आपल्या खांद्यावर बसवून सम्राट महालात परतला.

महालात लोकांनी सम्राटाचे भव्य स्वागत केले. राज्यातील लोक दुष्ट बंडखोरांच्या जुलमांना कंटाळले होते. पण बंडखोरांविरुद्ध काही करायला ते कचरत होते. आता प्रत्यक्ष सम्राट त्यांना मार्गदर्शन करण्यासाठी हजर होता. त्याच्या आदेशावरून लोकांनी कारस्थानी बंडखोरांना तुरुंगात टाकले.

सम्राटाच्या इतर मुला-मुलींना सम्राट परतल्याची खबर मिळाली. आपली रडगाणी बंद करून ते वडिलांच्या स्वागतासाठी त्वरीत राज्यात परतले. पण परतल्यावर सम्राटाच्या शेजारी छोट्याशा सिंहासनावर बुटकी राजकुमारी बसली असल्याचे त्यांना दिसले.

आपल्या मृत्यूपर्यंत सम्राटाने बुटकी राजकुमारीला सोबत बसवून राज्य केले. तिला फक्त वडिलांच्या प्रेमाचा ओलावा हवा होता, आणखी काही नको होते. त्यानंतर सम्राट प्रत्येक मनुष्याचा आदर करू लागला – मग तो मोठा असो की लहान. असे म्हणतात की सम्राटाच्या मृत्यूनंतर बुटकी राजकुमारीने अतिशय पारदर्शीपणे आणि मोठ्या निष्ठेने राज्यकारभार सांभाळला.